<u>यशंवत पंचायत राज अभियान सन २०१४-१५</u>
**राज्यातील अत्युत्कृष्ट जिल्हा परिषदा, पंचायत समित्या आणि ग्रामपंचायतींना पुरस्कार योजनेसाठी निधी वितरण.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः झेडपीए-२०१५/प्र.क्र.०२/पंरा-१**

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट
मुंबई - ४०० ००१
तारीखः ९ मार्च , २०१५

<u>वाचा -</u>

१) **शासन निर्णय क्रमांकः झेडपीए-२०१४/प्र.क्र.९१/पंरा-१, दिनांक २६ ऑगस्ट, २०१४**
२) **शासन निर्णय क्रमांकः झेडपीए-२०१४/प्र.क्र.९१/पंरा-१, दिनांक ९ फेब्रुवारी, २०१५**

**शासन निर्णय-**

ग्रामीण महाराष्ट्राच्या विकासामध्ये पंचायत राज संस्थांचे योगदान उल्लेखनीय आहे. राज्यामधील विकासाच्या सर्व योजना पंचायत राज संस्थामार्फत राबविल्या जातात. त्यामुळे पंचायत राज संस्थांना त्यांनी केलेल्या कामगिरीनुसार प्रोत्साहित करणे आवश्यक आहे. यासाठी राज्यातील पंचायत राज संस्थांचे व्यवस्थापन व विकास कार्यात अत्युत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या आणि ग्रामपंचायतींसाठी सन २००५-०६ या आर्थिक वर्षापासून विभागस्तरावर व राज्यस्तरावर यशवंत पंचायत राज अभियान ही अभिनव पुरस्कार योजना सुरू करण्यात आली आहे. या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेले अनुदान विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्या अधिनस्त ठेवण्यात येते. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांना शासन निर्णय क्रमांक झेडपीए-२०१४/प्र.क्र.९१ पंरा-१, दिनांक २६ ऑगस्ट, २०१४ अन्वये नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित केले आहे. या योजनेअंतर्गत सन २०१४-१५ या चालू वित्तीय वर्षात रू. २.९१ कोटी (रुपये दोन कोटी, एक्याण्णव लक्ष फक्त) इतकी रक्कम अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे.

२ यावर्षी यशवंत पंचायत राज अभियान हा कार्यक्रम दिनांक १५ मार्च, २०१५ रोजी आयोजित करण्यात आला आहे. या कार्यक्रमाचा खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पीत केलेल्या रु. २.९१ कोटी (रुपये दोन कोटी, एक्याणव लक्ष फक्त) इतक्या रक्कमेपैकी रु. २,३२,८०,०००/- (रुपये दोन कोटी, बत्तीस लक्ष, ऐंशी हजार मात्र) इतकी रक्कम शासन निर्णय समक्रमांक दिनांक ९ फेब्रुवारी, २०१५ अन्वये वितरित करण्यात आली आहे. आता उर्वरित रु. ५८,२०,०००/ (रु. अठ्ठावन्न लक्ष विस हजार

फक्त) इतकी रक्कम या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत आहे. सदरचा खर्च मागणी क्रमांक एल-३ २५१५ -इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०१-पंचायती राज, ३१ सहाय्यक अनुदाने, (०१) (०४) विशेष कार्यक्रम व ग्राम अभियान कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यामध्ये उत्कृष्ट काम केल्याबद्दल जिल्हा परिषदांना व पंचायत समित्यांना प्रोत्साहनपर अनुदान (संकेतांक २५१५ ००६२) (दत्तमत) (योजनेतर) लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ च्या मंजूर तरतूदीमधून करण्यात यावा.

३. वरील रक्कम विभागीय आयुक्त, कोकण भवन, नवी मुंबई यांच्या अधिनिस्त ठेवण्यात येत आहे.

४. उपरोक्त शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५२/ अर्थ- १७ दिनांक ५ मार्च, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०९१४५०१८३९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shakuntala Ramesh Sable

Digitally signed by Shakuntala Ramesh Sable
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=268d68519b25b24516bc229de7df4b9053342e9f1b3101d45083a62b09a38a44, cn=Shakuntala Ramesh Sable
Date: 2015.03.09 16:34:43 +05'30'

**श. र. साबळे**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई
२. अप्पर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, नागपूर.
५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, नवी मुंबई.
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (कार्यासन अर्थ-३, अर्थ-१७, व्यय-१५ व अर्थोपाय शाखा), मंत्रालय, मंबई.
९. ग्राम विकास व जलसंधारण विभाग (कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-४, वित्त-७, वित्त-८, पंरा-४ व समन्वय कक्ष, बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
१०.निवडसंग्रह (कार्यासन पंरा-१).